# मांजरीची पिल्ले कशी वाढतात?



लेखिका: मिलिसेंट सेल्सम

चित्रे: नील जॉन्सन



आई मांजरीने नुकतेच
चार पिल्लांना जन्म
दिला आहे.
ती एका कुशीवर
झोपली आहे आणि
पिल्लांना चाटत आहे.



प्रत्येक पिल्लू अगदी छोटेसे आहे.

ते बघू शकत नाहीत, कारण त्यांचे डोळे बंद आहेत.

ते ऐकू शकत नाहीत, कारण त्यांचे कान बंद आहेत.

पण ते वास घेऊ शकतात, स्पर्श करून ऊब जाणू शकतात.

प्रत्येक पिल्लू रांगत आपल्या आईच्या ऊबदार शरीराकडे जाते.
त्याचे पुढचे पाय सावकाश पुढे सरकतात.
तो त्याचे मागचे पाय पुढे ओढत सरकतो.
त्याचे डोके डावी-उजवीकडे डुलत असते.
शेवटी तो आई मांजरीजवळ पोहोचतो.



आता पिल्ले आपले नाक आणि तोंड आई मांजरीच्या केसाळ अंगाशी रगडू लागतात.

जोवर त्यांच्या तोंडाला आई मांजरीचे स्तनाग्र लागत नाहीत, तोवर ते आपले तोंड तिच्या अंगाला रगडत राहातात.

मग पिल्ले आपल्या तोंडाने स्तनाग्र तोंडात धरतात आणि त्यातील दूध चोखू लागतात.

प्रत्येक पिल्लू जन्मल्यानंतर तासाभरातच दूध पिऊ लागते.





या छोट्याशा पिल्लांना त्यांच्या आईची गरज असते.

आई त्यांची योग्य काळजी घेते.

आई त्यांना ऊब देते.

आई त्यांना सुरक्षित ठेवते.

चार दिवस आई मांजर सतत पिल्लांसोबत राहाते.

दर दोन तासांनी आई मांजर उठते आणि आळस देते.

मग ती काही खाऊन घेण्यास निघते.

चौथ्या दिवसानंतर, आई मांजर बऱ्याचदा उठते.

आई मांजर बाहेर जाते, तेव्हा पिल्ले झोपून राहातात.

बहुतेकदा पिल्ले एकमेकांच्या अंगावर झोपतात.

यामुळे त्या सगळ्यांना ऊब मिळते.



आई मांजर परतून आपल्या पिल्लांना चाटते. यामुळे पिल्ले जागी होतात.

मग आई मांजर पडून राहाते आणि पिल्ले पुन्हा तिचे दूध पिऊ लागतात.

आतापर्यंत, प्रत्येक पिल्लाने दूध पिण्यासाठी एका खास स्तनाग्राची निवड केलेली असते.

दुसऱ्या पिल्लाने त्या स्तनाग्राला तोंड लावले तर आधीचे पिल्लू आपण निवड केलेले स्तनाग्र घट्ट पकडून ठेवते, ते सोडतच नाही.

पिल्ले दोन आठवड्यांची झाल्यावर,
त्यांचे डोळे उघडतात.
त्यांचे कानसुद्धा उघडतात.

मांजरीची पिल्ले वाढू लागतात.
जन्माला आल्यावर त्यांचे वजन जितके होते ते आता दुप्पट होते.



पिल्ले अजून रांगतच असतात.
ते अजून चालू शकत नाहीत.
पण ते आता पहिल्यापेक्षा जास्त गोष्टी बघू आणि ऐकू शकतात.



काहीवेळा एखादे पिल्लू रांगत रांगत आईपासून दूर जाते. पण तेव्हा त्यांना फरशी थंड लागते.
फरशीचा गंधही त्यांना वेगळा जाणवतो.
मग पिल्लू रडू लागते.
त्याची आई त्याचे रडणे ऐकते.
ती त्याच्याकडे पोहोचते आणि त्याला आपल्या तोंडात धरून परत आणते.



आता पिल्ले चार आठवड्यांची झाली आहेत. आई त्यांच्याजवळ आली नाही तरी पिल्ले आईकडे दूध पिण्यास जाऊ शकतात.

दर आठवड्याला त्यांचे वजन सहा औंसने (170 ग्रॅमने) वाढते.



आता पिल्ले त्यांच्या पायांवर उभी राहातात आणि सावकाश चालू लागतात.
त्यांचे पाय अजूनही लडखडतात.
पण आता त्यांना अगदी स्पष्ट दिसू लागते.
ते आता व्यवस्थित ऐकूही लागतात.





हळूहळू आई मांजर पिल्लांकडे पूर्वीपेक्षा कमी वेळा जाऊ लागते. मग छोटी पिल्ले आपल्या आईच्या मागे मागे फिरू लागतात, ते आईला झोपवून तिचे दूध पिऊ लागतात.

प्रत्येक पिल्लू अजूनही आपल्या आईच्या खास स्तनाग्राचे दूध पितात.



आता पिल्ले एकमेकांशी खेळू लागतात.
ते एकमेकांना चाटू लागतात.
ते एकमेकांचा पाठलाग करू लागतात.
ते एकमेकांवर लोळू लागतात..

जे काही सापडेल त्याच्याशी ते खेळू लागतात.



पिल्ले आपल्या आईच्या मागे मागे पळू लागतात.

ते तिच्यावर उडी घेतात.

ते आईचे तोंड चाटतात.

ते तिच्या शेपटीचे चावे घेतात.



कधी कधी पिल्ले खूप
जास्त खोडकर होतात.
मग आई मांजर उडी
मारून पिल्लांपासून दूर
निघून जाते.

कधी ती एखाद्या उंच
स्टुलावर किंवा शेल्फवर
चढून बसते.
कधी ती पिल्लांना
मारतेसुद्धा.





जेव्हा पिल्ले पाच आठवड्यांची होतात,
तेव्हा त्यांना आपल्या आईकडून कमी दूध
मिळते.
पण आता ते वाडग्यातून दूध पिऊ शकतात.





आई काही कामासाठी जाते तेव्हा पिल्ले तिच्या मागे मागे जातात. काहीवेळा ते अन्न ठेवलेल्या भांड्यात पाय ठेवतात. काहीवेळा ते जमिनीवर ठेवलेल्या अन्नात आपला पाय ठेवतात.

मग ते खरकटं लागलेले त्यांचे पाय चाटतात.

किती चविष्ट लागते ते!

काहीवेळा ते आईच्या तोंडाला लागलेले जेवण चाटतात आणि त्याची चव चाखतात. अशा तऱ्हेने ते घन अन्न खायला शिकतात.

शेतांवर, मांजरी स्वत:च आपल्या अन्नाचा शोध घेतात.
सुरुवातीला, आई मांजर आपल्या पिल्लांसाठी एखाद्या जनावराची शिकार करून आणतात.
यामुळे पिल्लांना कळते की भविष्यात कोणत्या जनावराची शिकार आपण करायची आहे.
मग आई शिकारीवर जाते तेव्हा पिल्लेही तिच्या मागोमाग जातात.





अशा प्रकारे मांजरीची पिल्ले छोट्या जनावरांची, विशेषत: उंदराची, शिकार करायला शिकतात. एव्हाना पिल्लांना दात येतात आणि ते आपले अन्न चावू शकतात. सुरुवातीला त्यांना दुधाचे दात येतात, अगदी तुम्हाला आले होते तसेच. पिल्लू सहा महिन्यांचे झाल्यावर, दुधाचे दात पडतात आणि प्रौढांचे दात येतात.

मांजरीची पिल्ले आठ आठवड्यांची झाल्यावर, त्यांना त्यांच्या आईकडून दूध मिळणे बंद होते. एव्हाना ते घन पदार्थ खायला शिकलेले असतात. ते शिकार करणे, वर चढणे, उड्या मारणे, पळणे, गवतातून गुपचुप चालत उंदीर पकडणे या गोष्टी करू शकतात.





आता ते ती सगळी कामे करू शकतात जी एक प्रौढ मांजर करू शकते.

मांजरीचे पिल्लू घरी आणायची ही अगदी योग्य वेळ असते.